**केंद्र पुरस्कृत योजनांचे निधी वितरण व विनियोग व्यवस्थापन या अनुषंगाने प्रशासकीय विभागांना बँक खाती उघडण्याबाबत द्यावयाच्या सुधारित सूचना**

# महाराष्ट्र शासन

## वित्त विभाग

**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२१/प्र.क्र.८४/कोषा प्रशा-५**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक- १५ सप्टेंबर, २०२१.

संदर्भ :- १. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२१/प्र.क्र.५१/२०/कोषा प्रशा-५, दि.१३.०३.२०२०
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२१/प्र.क्र.५१/२०/कोषा प्रशा-५, दि.०३.०३.२०२१
३. भारत सरकार यांच्या वित्त मंत्रालयाचे कार्यालयीन ज्ञापन F.No.1(13)/PFMS/FCD/2020, दिनांक २३/०३/२०२१

## प्रस्तावना:-

संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये शासकीय कार्यालये, सार्वजनिक उपक्रम व महामंडळे इ.कडील बँकींग विषयक व्यवहार केवळ राष्ट्रीयकृत बँकांमार्फत करण्याचे धोरण घोषित करण्यात आलेले आहे. दि. ३ मार्च, २०२१ च्या शासन निर्णयाद्वारे त्यामध्ये आंशिक सुधारणा करण्यात येऊन खाजगी बँकांना केवळ संगणक प्रकल्प राबविण्यासाठी "T+१" तत्वावर परवानगी देण्यात आली. दरम्यानच्या काळात केंद्र शासनाने केंद्र पुरस्कृत योजनांच्या अंमलबजावणीबाबत दि.२३ मार्च, २०२१ च्या पत्राद्वारे सूचना निर्गमित केल्या. सदर सूचनांचा विचार करता, वित्त विभागाने दि.१जुलै, २०२१ च्या परिपत्रकाद्वारे सर्व विभागांना कार्यवाही करण्याच्या सूचना दिलेल्या आहेत. त्यान्वये केवळ स्टेट बँक ऑफ इंडिया किंवा राष्ट्रीयकृत बँकांमध्ये सिंगल नोडल एजन्सी (SNA) व इम्प्लीमेंटींग एजन्सी (IA) यांची बँक खाती उघडण्याचे निर्देश दिलेले आहेत. तथापि, केंद्र शासनाच्या दि.२३ मार्च, २०२१ च्या धोरणानुसार केंद्र पुरस्कृत योजनांच्या अंमलबजावणीसाठी कोणत्याही शेडयुल्ड कमर्शियल बँकेत खाती उघडण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. केंद्र शासनाच्या सूचनांनुसार राज्य शासनाच्या बँकांबाबतच्या धोरणात पुढीलप्रमाणे बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

(१) केंद्र शासनाच्या सूचनांनुसार प्रत्येक केंद्र पुरस्कृत योजनेसाठी "एक सिंगल नोडल एजन्सी" निश्चित करावयाची आहे. सदर एजन्सीने योजनेसाठी "एक सिंगल नोडल बँक खाते" उघडावयाचे आहे. राज्य शासनाचे धोरण केंद्र शासनाच्या सूचनांशी सुसंगत करण्याच्या दृष्टिने विभागांच्या सिंगल नोडल एजन्सींना (SNA) पुढील बँकांमध्ये खाते उघडण्याची मान्यता देण्यात येत आहे.

(अ) स्टेट बँक ऑफ इंडिया किंवा इतर कोणतीही राष्ट्रीयकृत बँक

(ब) भारतीय रिझर्व्ह बँकेने दि.१९ जानेवारी, २०२१ च्या परिपत्रकाद्वारे Domestic Systemically Important Banks म्हणून घोषित केलेली "आयसीआयसीआय बँक".

(२) याशिवाय प्रत्यक्ष अंमलबजावणी संस्थांच्या ( Implementing Agency ) स्तरावर Zero Balance Subsidiary Accounts उघडणे अपेक्षित आहे. सदर खाती तालुका व जिल्हा स्तरावर असणार आहेत. प्रत्यक्ष अंमलबजावणी संस्था ( IA ) अशी खाती खालीलपैकी बँकांमध्ये उघडू शकतील.

(अ) वरील परिच्छेद (१) मध्ये सिंगल नोडल एजन्सीचे बँक खाते उघडण्यास मान्यता देण्यात आलेल्या स्टेट बँक ऑफ इंडिया, राष्ट्रीयकृत बँका, आयसीआयसीआय बँक

(ब) केंद्र शासनाच्या सूचनांनुसार प्रत्यक्ष अंमलबजावणी संस्थांनी स्थानिक परिस्थितीनुसार कोणत्याही शेडयुल्ड कमर्शियल बँकेची निवड करण्याची अनुमती आहे. त्याच धर्तीवर राज्यातही "अंमलबजावणी संस्थांनी" त्यांचे स्तरावर भारतीय रिझर्व्ह बँकेने (RBI) घोषित केलेल्या शेडयुल्ड कमर्शियल बँकेची (स्टेट बँक ऑफ इंडिया/ राष्ट्रीयकृत बँका/खाजगी बँका) निवड करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

शक्यतो ज्या बँकेत सिंगल नोडल एजन्सीचे बँक खाते उघडण्यात आले आहे त्याच बँकेत प्रत्यक्ष अंमलबजावणी संस्थांची बँक खाती उघडणे योग्य राहील. मात्र वेगळया बँकेची निवड करावयाची झाल्यास सिंगल नोडल एजन्सीचे बँक खाते व अंमलबजावणी स्तरावर निवड केलेल्या अन्य बँकेमधील खाते यामध्ये माहितीचे आदान प्रदान सुरळीत व अखंडीतपणे होईल याची खात्री विभागांनी त्यांच्या स्तरावर करणे आवश्यक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्याwww.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९१५१४४२२९५४०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

INDRAJEET SAMBHAJI GORE

Digitally signed by INDRAJEET SAMBHAJI GORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=6015944fe7d58a83f4a54c43147b5da1e34861e2984e9f793b66f7249aaa9c1a,
pseudonym=CAD826A943AA15444490C64B66C7EE464C4AD05A,
serialNumber=D4994742192306FCC1DEA9AADD3810639506519FA652B919767B98B04E905A18, cn=INDRAJEET SAMBHAJI GORE
Date: 2021.09.15 14:45:10 +05'30'

**( इंद्रजित गोरे )**
**शासनाचे उपसचिव**

**प्रत,**

१.मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२.सर्व मा.विधानसभा / विधान परिषद व संसद सदस्य,
३.मा.राज्यपाल यांचे सचिव
४.मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
५.मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
५.सर्व मा.मंत्री व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६.सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग

७.सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांच्या अधिनस्त असलेले विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख
८.प्रबंधक, मुळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
९.प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)- १, महाराष्ट्र, मुंबई
१०.प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
११.महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१२.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१३.आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई ४००००२
१४.आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन, नागपूर ४४४००१
१५.प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई
१६.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१७.सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई
१८.प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१९.प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
२०. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२१.विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली
२२.सर्व विभागीय आयुक्त
२३.सर्व जिल्हाधिकारी
२४.सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
२५.संचालक , लेखा व कोषागारे, मुंबई
२६.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२७.सहसंचालक,लेखा व कोषागारे,कोकण/पुणे / नाशिक/औरंगाबाद/ अमरावती/नागपूर
२८.संचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा, कोकण भवन, नवी मुंबई
२९.सहसंचालक,स्थानिक निधी लेखापरीक्षा कोकण/पुणे/ नाशिक/औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर
३०.वित्त विभागातील सर्व कार्यासने
३१.निवड नस्ती कोषा प्रशा.५